**भाटघर प्रकल्पांतर्गत मौजे भुतोंडे, नऱ्हे, बारे बु. व वाकांबे, ता. भोर, जि. पुणे या पुनर्वसित गावठाणांतील नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: पुनर्व-२०२२/प्र.क्र.१०९/र-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक: ०७ जून, २०२३

वाचा -

१) वित्त विभाग शासन निर्णय क्र.बीजीटी-२२७६/७/बीयुडी-१४, दि.२९/१२/१९७६
२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१/८/२००९
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९
४) महसूल व वन विभाग शासन परिपत्रक क्र: आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८/३/२०११
५) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: संकिर्ण२०११/प्र.क्र.८०(भाग-२)/र-८, दि. २५/०७/२०१३
६) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि. १७/०४/२०१५
७) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र: आरपीए-२०१५/प्र.क्र.२१४/र-१, दि. २३/०९/२०१५
८) सार्वजनिक बांधकाम विभाग शासन निर्णय क्र:विअसु-२०१५/प्र.क्र.२१८/इमारती-२,दि. १६/१२/२०१५
९) वित्त विभाग शासन निर्णय क्र: विअप्र-२०१५/प्र.क्र.२०/२०१५/विनियम, दि. १९/०१/२०१६
१०) वित्त विभाग शासन निर्णय क्र: व्यअस-२०२२/प्र.क्र.१२०/अर्थसंकल्प-२, दि. १९/१०/२०२२
११) विभागीय आयुक्त, पुणे यांचे क्र. पुनर्व/कावि-४/६५५-६५६-६५७/२०११, दि. २९/१२/२०११ रोजीचे आदेश
१२) उपायुक्त (पुनर्वसन), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांचे पत्र क्रमांक: पुनर्व. उपले/आर आर/ १४८२/२०२२, दि. ८/८/२०२२

प्रस्तावना-

भाटघर प्रकल्पामुळे बाधित झालेल्या ४० गावठाणांतील रूपये १६२१.३९ लक्ष किंमतीच्या १०९ नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ११ येथील विभागीय आयुक्त, पुणे यांच्या दि. २९.१२.२०११ रोजीच्या आदेशान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. यामध्ये मौजे भुतोंडे, नऱ्हे, बारे बु. व वाकांबे ता. भोर जि. पुणे या पुनर्वसित गावठाणांमधील ५ नागरी सुविधा कामांचा समावेश होता. सदर नागरी सुविधा कामांच्या जागा बदलल्यामुळे कामाच्या परिमाणात झालेली वाढ, दरसूचीतील वाढ व करपद्धतीतील बदल इत्यादी कारणांमुळे या कामांच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव उपायुक्त (पुनर्वसन), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांनी संदर्भाधीन क्र. १२ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे.

२. संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयातील तरतुदींमध्ये संदर्भाधीन क्र. १० येथील शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून त्यानुसार प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार

उपायुक्त (पुनर्वसन), विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे यांच्याकडून प्राप्त प्रस्तावातील नागरी सुविधा कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

भाटघर प्रकल्पांतर्गत मौजे भुतोंडे, नऱ्हे, बारे बु. व वाकांबे ता. भोर जि. पुणे या पुनर्वसित गावठाणांमधील पुढील तक्त्यात नमूद ५ नागरी सुविधा कामांच्या एकूण रूपये २,७०,६४,३५६/- (अक्षरी रूपये दोन कोटी सत्तर लक्ष चौसष्ट हजार तीनशे छपन्न फक्त) रकमेच्या अंदाजपत्रकांस खालील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे-

| अ. क्र. | पुनर्वसित गावठाणाचे नाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | विभागीय आयुक्त, पुणे यांच्या दि. २९.१२.२०११ रोजीच्या आदेशान्वये मूळ प्रशासकीय मान्यता रक्कम रूपये | सुधारित प्रशासकीय मान्यता/ सुधारित अंदाजपत्रकीय रक्कम रूपये |
|---|---|---|---|---|
| १ | भुतोंडे | ग्रामपंचायत | ६,६२,४७८/- | १०,३१,५३२/- |
| २ | नऱ्हे | पोहोच रस्ता | ८०,७०,६०८/- | १,४५,०९,२४६/- |
| ३ | बारे बु. | पोहोच रस्ता | ११,१३,४४७/- | २३,७३,०७३/- |
| ४ | वाकांबे | पोहोच रस्ता | ४९,९९,२८२/- | ८१,३०,१६७/- |
| ५ | भुतोंडे | स्मशानभूमी | ५,२९,६४१/- | १०,२०,३३८/- |
| **एकूण** | | | **१,५३,७५,४५६/-** | **२,७०,६४,३५६/-** |

२. भाटघर प्रकल्पांतर्गत मौजे भुतोंडे, नऱ्हे, बारे बु. व वाकांबे ता. भोर जि. पुणे या पुनर्वसित गावठाणांमधील उपरोक्त तक्त्यात नमूद ५ नागरी सुविधा कामांची अंमलबजावणी करताना प्रशासकीय मान्यता देण्याबाबतच्या संदर्भाधीन क्र. ११ येथील विभागीय आयुक्त, पुणे यांच्या दि. २९.१२.२०११ रोजीच्या आदेशातील अटी व शर्तीचे पालन करावे. प्रस्तुत प्रकरणी सदर २ नागरी सुविधा कामांना खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१) सन १९७६ पूर्वीच्या प्रकल्पाने बाधित पुनर्वसित गावांना नागरी सुविधा पुरविणे या संदर्भात शासनाने वेळोवेळी विहित केलेली धोरणे, मार्गदर्शक तत्वे व वित्तीय अधिकार मर्यादा तसेच निर्गमित करण्यात आलेले शासन निर्णय, अटी/शर्ती इत्यादी बाबींचे अनुपालन करण्याची दक्षता घ्यावी.

२) सदर सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबीनिविदा विषयक क्षेत्रिय , अशा प्रकरणाची तपासणी .निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहित धरली जाणार नाही त्यावेळच्या प्रचलित शासन नियमानुसार करण्याची जबाबदारी प्रकल्पयंत्रणेची राहील.

३. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्रमांक ८०/१४७५, दि. २१.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे यांनी निविदेनुसार कामे तात्काळ सुरु करावेत व नागरी सुविधा कामांच्या प्रगतीचा अहवाल (Work Progress Report)/खर्चाच्या प्रगतीचा अहवाल (Expenditure Progress Report) इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार व सन २०२३-२०२४ या आर्थिक

वर्षाच्या कालावधीत कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार "मागणी क्रमांक सी-१० ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प ४७०१-एच-७२७ (कार्यक्रमांतर्गत) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली आवश्यक निधीची मागणी शासनास सादर करावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०६०७१७०५१२५२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, pseudonym=CB263AE7A97BA5DB04805052B34A6E185702D5F9, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF979409826984378A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2023.06.07 17:05:19 +05'30'

**( संजय जगताप )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) पुणे विभाग, पुणे.
२. जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, पुणे.
३. उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे.
४. कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. उपजिल्हाधिकारी (पुनर्वसन), पुणे.
९. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-२/६, मंत्रालय,मुंबई-३२.
१०.नियोजन विभाग, कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
११.महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, पी.ए.सी.कार्यासन ,मंत्रालय,मुंबई ३२.
12. निवडनस्ती कार्यासन र-८, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.